**कोरोना या आजाराच्या प्रतिबंधात्मक उपाययोजनेच्या जनजागृतीच्या उपक्रमास प्रशासकीय मान्यता देण्याबाबत.**

# महाराष्ट्र शासन

## सार्वजनिक आरोग्य विभाग

## शासन निर्णय, क्रमांकः आयईसी २०१९/प्र.क्र. २६७ /आरोग्य ३

१० वा मजला, गोकुळदास तेजपाल रुग्णालय संकुल इमारत,
लोकमान्य टिळक रुग्णालय मार्ग, मंत्रालय, मुंबई - ४०० ००१.

दिनांक : १७ मार्च, २०२०.

**वाचा :**

१) **शासन निर्णय, सामान्य प्रशासन विभाग, क्रमांक - मावज २०१६/प्र.क्र.३९७/३४, दि.०५.०१.२०१७**

२) **शासन निर्णय, सार्वजनिक आरोग्य विभाग, क्रमांक - प्रशामा-२०२०/प्र.क्र.६०/आरोग्य-८, दि.१३.०३.२०२०**

३) **आयुक्त, आरोग्य सेवा व अभियान संचालक, राष्ट्रीय आरोग्य अभियान, मुंबई यांचे पत्र क्र.राआसो/करोना प्रतिबंधात्मक उपाययोजना/११४०२३/२०२०, दि.०५.०३.२०२०.**

४) **माहिती व जनसंपर्क महासंचालनालय, मुंबई यांचे पत्र क्रमांक-संचा(मा)(प्रशा)/२०२०/२३,दिनांक- ११.०३.२०२०.**

**प्रस्तावना:**

कोरोना या संसर्गजन्य आजाराचा संपूर्ण जगभरात प्रादुर्भाव होत आहे. त्यास वेळीच अटकाव तसेच प्रतिबंधात्मक उपाययोजना करण्याकरीता जनमानसामध्ये जनजागृती तातडीने करणे आवश्यक आहे. त्याकरीता एक तातडीची बाब म्हणून वैद्यकिय साहित्य व उपकरणे इत्यादींच्या खरेदीसाठी व जनजागृतीसाठी सन २०१९-२० या आर्थिक वर्षात सुधारीत अनुदान वित्त विभागाच्या सहमतीने उपलब्ध करुन देण्यात आले आहे. त्यानुसार कोरोना या आजाराच्या जनजागृती कार्यक्रमास प्रशासकिय मान्यता देण्याची बाब शासनाच्या विचाराधीन होती. यासंदर्भात पुढीलप्रमाणे निर्णय घेण्यात येत आहे.

**शासन निर्णय:**

कोरोना कोविड १९ या आजाराच्या प्रतिबंधात्मक उपाययोजना करण्याकरीता आरोग्य शिक्षण व जनजागृती करण्याकरीता जाहिरात वितरण धोरणानुसार माहिती व जनसंपर्क महासंचालनालय, मुंबई यांनी तयार केलेल्या खालील माध्यम आराखाडयास प्रशासकीय मान्यता देण्यात येत आहे.

| Sr.No. | Media | Details | Rate | Frequency | | Total (Rupees) |
|---|---|---|---|---|---|---|
| | | | | Details of frequency | Frequency | |
| 1 | Newspapers | In A Grade Newspapers 400 Sq cm. | 5000000 | No. of insertions | 2 | 10000000 |
| 2 | 11 Private TV Enterainment,New Channels | 60 Sec. TVC 6 times on each Channel in a day | 1000000 | No.of Days | 10 | 10000000 |
| 3 | 55 Private FM Radio Channels | 60 Sec. Jingle 9 times on each Channel in a day,All FM Channel | 175000 | No.of Days | 10 | 1750000 |
| 4 | Akashwani | Morning 7.10 and Evening 7.00 P.M. News Midbreak | 170000 | No.of Days | 10 | 1700000 |
| 5 | Doordarshan | Evening 7.00 and 9.00 P.M. New MidBreak | 120000 | No.of Days | 10 | 1200000 |
| 6 | Social Media | For Facebook, Twitter and other Social Cretive and posting, Bulk SMS | | | | 2500000 |
| 7 | Hoarding/OUTDOOR | DGIPR Rate -Sole Right Vendor, DAVP Vendor | | No. of Hoarding | | 4350000 |
| | | **Total** | | | | **315,00,000** |

२. वरील प्रस्तावातील खर्च लेखाशीर्ष ४२१० ११०१- (५२) यंत्रसामुग्री व साधनसामुग्री या लेखाशीर्षातंर्गत रु.९.८२ कोटी इतके सन २०१९-२० मधील मंजुर निधीतून भागविण्यात यावा. सदर जनजागृती उपक्रमांची अंमलबजावणीची कार्यवाही महासंचालक, माहिती व जनसंपर्क महासंचालनालय, मुंबई यांचेमार्फत करण्यात यावी.

३. सार्वजनिक आरोग्य विभागांतर्गत विविध आरोग्य विषयक उपक्रमांविषयीची जनजागृतीबाबतची देयके अदा करण्यापुर्वी दुरचित्रवाणी, रेडीओ, वृत्तपत्रे, जाहिरात फलक, एसटी बस पॅनल तसेच एसटी बसमधील सीटबॅक, एसटी स्टँडवरील होर्डींग, प्रवासी रिक्षा पॅनल, रेल्वे डिस्प्ले, एसएमएसव्दारे संदेश, सिनेमागृहात प्रसिध्दी, पीव्हीसी बॅनर्स इ.विविध प्रसिध्दी साधनांव्दारे संबंधित सर्व उपक्रमांअंतर्गत मंजुर केलेल्या जाहिरातींची संख्या व प्रत्यक्ष प्रदर्शित केलेली संख्या बरोबर असल्याबाबत खात्री करुन घेण्यासाठी आयुक्त, आरोग्य सेवा तथा संचालक, राष्ट्रीय आरोग्य अभियान, मुंबई यांनी व्यवस्था तयार करावी. तद्नंतरच देयक अदा करणेबाबत पुढील कार्यवाही करावी.

४. सदर शासन निर्णय, वित्त विभाग क्र.विअप्र-२०१३/प्र.क्र.३०/२०१३/विनियम भाग-२, दि.१७.४.२०१५ सोबतच्या परिशिष्टातील वित्तीय अधिकार नियम पुस्तिका,१९७८ भाग पहिला, उपविभाग-दोन मधील अ.क्र.४,नियम क्र.७ अन्वये प्रशासकीय विभागास प्रदान करण्यात आलेल्या अधिकारानुसार निर्गमित करण्यात येत आहे.

५. सदर शासन निर्णय महाराष्ट्र शासनाच्या www.maharashtra.gov.in या संकेतस्थळावर उपलब्ध करण्यात आला असून त्याचा संकेताक २०२००३१२१६५२४६५९१७ असा आहे. हा आदेश डिजीटल स्वाक्षरीने साक्षांकित करुन काढण्यात येत आहे.

महाराष्ट्राचे राज्यपाल यांच्या आदेशानुसार व नावाने.

Digitally signed by Roshani Dinesh Kadam Patil
DN: CN = Roshani Dinesh Kadam Patil, C = IN, S = Maharashtra, O = Government Of Maharashtra, OU = Public Health Department
Date: 2020.03.17 17:12:57 +05'30'

**( रो. दि. कदम -पाटील )**

अवर सचिव, महाराष्ट्र शासन.

प्रत,

१. महालेखापाल- १ / २, महाराष्ट्र, (लेखा परिक्षा) (लेखा व अनुज्ञेयता), मुंबई/ नागपूर.
२. आयुक्त, आरोग्य सेवा तथा संचालक, राष्ट्रीय ग्रामीण आरोग्य अभियान, मुंबई.
३. महासंचालक, माहिती व जनसंपर्क महासंचालनालय, मुंबई.
४. संचालक, आरोग्य सेवा, मुंबई.
५. सहसंचालक, (अर्थ व प्रशासन)आरोग्य सेवा, मुंबई.
६. उप संचालक, आरोग्य सेवा, राज्य आरोग्य शिक्षण व संपर्क विभाग, पुणे.

७. जिल्हा कोषागार अधिकारी, पुणे.
८. वित्त विभाग (कोषागारे/ प्रशासन ५), मंत्रालय, मुंबई.
९. अवर सचिव, सार्वजनिक आरोग्य विभाग (कु.क./अर्थसंकल्प), मंत्रालय, मुंबई.
१०.निवडनस्ती (कार्यासन आरोग्य-३).